राज्यातील रद्द/ व्यपगत झालेल्या ऑटोरिक्षा परवान्यांचे नुतनीकरण करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक - एमव्हीआर ०८१५ /प्र.क्र.३८७ /परि २
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई
दिनांक -१ ऑक्टोबर, २०१५

**प्रस्तावना -**

राज्यामध्ये विविध कारणास्तव १,४०,०६५ ऑटोरिक्षांचे परवाने रद्द / व्यपगत झालेले असून सदर नुतनीकरण न करण्यामागे प्रामुख्याने उशिरा योग्यता प्रमाणपत्र नुतनीकरणासाठी विविध परिवहन प्राधिकरणांनी लागू केलेले सहमत शुल्काची रक्कम ऑटोरिक्षा परवानाधारक भरु न शकणे हे कारण असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. तसेच राज्यातील विविध परिवहन प्राधिकरणांनी उशिरा योग्यता प्रमाणपत्र नुतनीकरणाबाबत घेतलेल्या निर्णयामध्ये मोठया प्रमाणात असमानता असून याबाबत राज्य परिवहन प्राधिकरणाने सर्व प्राधिकरणांच्या निर्णयात एकसुत्रता आणणे आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेऊन राज्यातील रद्द/व्यपगत झालेल्या ऑटोरिक्षांचे परवाने नुतनीकरण करण्यासाठी एक वेळची संधी म्हणून सहमत शुल्काची रक्कम वाजवी आकारुन नुतनीकरण करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्यामधील रद्द / व्यपगत झालेल्या ऑटोरिक्षा परवान्यांचे नुतनीकरण करण्यासाठी थकित एक रक्कमी कराची तसेच पर्यावरण कराची रक्कम अदा करणे आणि महाराष्ट्र मोटार वाहन नियम १९८९ च्या नियम ७५ (६) मधील तरतूदी अन्वये विहित केलेले शुल्क अदा करणे त्याचप्रमाणे वित्त दात्याचे ना- हरकत प्रमाणपत्र प्राप्त केलेले असणे इ. अटींचे पालन करणे आवश्यक राहील.

२. राज्यातील रद्द / व्यपगत झालेल्या ऑटोरिक्षा परवान्यांचे नुतनीकरण करण्यासाठी एकवेळची संधी म्हणून मोटार वाहन अधिनियम १९८८ च्या कलम ८६ नुसार विविध परिवहन प्राधिकरणांनी उशिरा योग्यता प्रमाणपत्र नुतनीकरणासाठी लागू केलेल्या सहमत शुल्काची कमाल मर्यादा दिनांक ३१ ऑक्टोबर २०१५ पर्यंत मुंबई महानगर क्षेत्रामध्ये रु. २०,०००/- आणि इतर क्षेत्रामध्ये रु. १५,०००/- याप्रमाणे लागू करण्याबाबत राज्यातील सर्व परिवहन प्राधिकरणांना निर्देश देण्यात येत आहेत.

३. ऑटोरिक्षा परवान्यांचे नुतनीकरण करण्यासंदर्भात राज्य परिवहन प्राधिकरण तसेच इतर क्षेत्रीय परिवहन प्राधिकरणे यांनी यापूर्वी केलेल्या ठरावामध्ये सदर शासन निर्णयान्वये आवश्यक सुधारणा करण्यात येत असून त्यानुसार तात्काळ अंमलबजावणी करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५१००११६४६४२४७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash K Sabale

Digitally signed by Prakash K Sabale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash K Sabale
Date: 2015.10.01 18:00:33 +05'30'

**(प्रकाश साबळे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) अध्यक्ष, परिवहन प्राधिकरण (सर्व)
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व पोलीस आयुक्त
९) सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
१०) सदस्य, परिवहन प्राधिकरण (सर्व)
११) सदस्य सचिव, परिवहन प्राधिकरण (सर्व)
१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (दोन प्रती प्रसिध्दी करीता)
१३) प्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व)
१४) निवड नस्ती (परि-२)